# दारू सोडा

## नाही तर

# जग

## सोडावे लागेल






AL BIRR
Socio-Religious Trust
Striving to Save Mankind from Hellfire

MAKE india BETTER

आपणा सर्वांना ज्ञात आहे की सर्व आजारांची जननी दारू आहे. याचा अर्थ असा आहे की जगातील अनेक आजार हे दारू च्या सेवनानेच जन्माला



येतात.दारू कधीही कोणाचे भले करत नाही शिवाय, त्याच्या निर्माते व विक्रेत्यांच्या. दारूमुळे फक्त दारू सेवन करणाऱ्या व्यक्तिचेच नव्हे तर त्याच्या संपूर्ण कुटुंबाची वाईट–दशा होऊन जाते. संपूर्ण कुटूंब अस्थ–व्यस्थ होते. परिवारातून सुखी जीवनाचा नायनाट होतो. दारूच्या सेवनामुळे व्यक्तिची प्रकृतीच नव्हे तर त्याची मालमत्ता, धन, दौलतही मोठया प्रमाणात नष्ट होते.

दारू सेवनानंतर त्या मनुष्या कडून जे कृत्य घडते त्याचे नुकसान प्रत्यक्ष त्याला तर होतेच त्याचबरोबर त्याच्या कुटूंबियांना, शेजाऱ्यांना,व अप्रत्यक्षरित्या समाजाला ही मोठया प्रमाणावर

भोगावा लागतो. नशे मध्ये त्याच्या कडून अनेक निकृष्ठ प्रतिचे कार्य केले जाते ज्यामध्ये जुगार खेळणे, एखादया स्त्रिची आब्रु लुटणे, पत्नी व मुलांना विनाकारण मारणे आणि दारू पिऊन वाहन चालवत असताना स्वत: बरोबर इतरांच्या जीवालाही धोका उदभवतो. असे अनेक कार्य त्याच्या कडून कळत न कळत होत असते. व त्याचा मानवी जीवनावर प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रित्या परिणाम होत असतो.



दारू सेवनाचा सर्वात महत्वाचा तोटा म्हणजे कौटुंबिक तणाव ज्यामुळे आज अनेक घरे देशोधडीला लागली आहे. किती तरी घरातील सुखी जीवन केवळ दारूचे शिकार झाले आहेत. आज चांगले सुशिक्षित लोक तसेच एके काळी चांगले व समृध्द जीवन जगणारे मेहनती मंडळी दारूसेवनाला बळी पडले आहेत. त्यामुळे त्यांच्यातील क्रियशीलता

व काम करण्याची इच्छा दिवसे न दिवस लोप पावली आहे. त्यामुळे संसाराची जबाबदारी त्याच्या पत्नीवर येऊन पडली आणि तो पत्नीच्या कमाई वर निर्भर झाला. संसाराची जबाबदारी त्याच्या पत्नीवर आल्याने घर व संसाराचे मोठया प्रमाणात नुकसान झालेले अनेक परिवार बघावयास मिळतात. पत्नी घरातुन बाहेर पडल्यामुळे सर्वात जास्त नुकसान मुलांच्या संगोपणावर होतो. असे असून ही संध्याकाळी दारू साठी पत्नी कडे पैसे मागणे व न–दिल्यास तिला मारहाण करणे. तरीही न मिळाल्यास पहिल्यांदा घरातील वस्तू विकणे त्यात ही न भागल्यास चोरी करण्यास प्रवृत्त होणे आणि शेवटी सगळीकडे ठोकरा खाल्ल्या शिवाय त्याला पर्याय राहत नाही व कधी कधी तर अपशब्द ऐकावे लागतात व मारही खावा लागतो. सकाळी घरातून चांगला निघालेला व्यक्ति संध्याकाळी परतताना रस्त्यावर लोळपाटे खात येत



असतो तर कधी कुठे तरी पडलेला सापडतो आणि अशा अवस्थेच त्याचा मृत्यु देखील होतो. व त्याच्या मुलांवरील पितृछाया समाप्त होते. तेव्हा त्याच्या पत्नीला व मुलांना जीवन जगण्यासाठी किती संघर्ष करावा लागतो हे कथन करण्याची गरज नाही.

ज्या दारूमुळे लोकांची इतकी भयानक वाईट दशा होते तीच दारू आज नव नवीन नावाने आकर्षीत पॅकींग मध्ये सजवून विक्रेते विकत आहेत आणि त्यास आपला समाज खास करून तरूण पिढी मोठया प्रमाणात बळी पडून व्यसनाधिन होत आहे. दारू समाजाला लागलेली एक कीड आहे. एक शाप आहे. असे म्हणण्यास हरकत नाही.

आज आपण दारू पिणाऱ्या लोकांना विचारले तर त्यांचे उत्तर असेल छे. मी कधीतरीच घेतो, तेही अतिशय कमी प्रमाणात. परंतु त्यांना हे समजत नाही की दारू एक नशा आहे. आणि नशेचे प्रमाण कमी वा अधिक असो ते आपल्या प्रकृतिला मोठया प्रमाणात नुकसान देते व व्यक्ती नाशेच्या आहारी जातो. याच्या मुळे दारू जणू आजारांना निमंत्रण देत असते व हे एक स्लो पॉयझनिंग आहे. त्याचे परिणाम लगेचच

दिसून येत नाही . परंतू जस जसे वय वाढत जाते तस तसे एक एक आजार जन्माला येत असतो . हाय ब्लड प्रेशर, ह्रदय विकार, लिवर चे आजार, लठ्ठपणा, असे अनेक आजाराना सुरूवात होते. या सर्व आजारातुन मुक्त होणे अतिशय कठिण आहे. दारूमुळे अनेक जिवघेण्या आजारांची निर्मीती होत आहे. त्यात लिवर सिरोसिस आणि पॅक्रीज. हे सर्व साधारण आजार आहेत जे अधिक व्यसनी लोकांना असतात. तर अधिक नशेमुळे कोण कोणते आजार होण्याची शक्यता आहे त्याची माहिती थोडक्यात प्राप्त करूया.

## 1. लिवर सिरोसिस :



दारू लिवर साठी विषा प्रमाणे आहे. लिवर मधील; ज्पेनम मांसवर, तंतु वर घात करतो त्यामुळे लिवर पुर्णपणे निकामी बनते

आणि लिवर शिवाय माणसाचे जिवंत राहणे अशक्य आहे. यामुळे आता तुम्हीच ठरवा दारू सोडणे चांगले कि हे जग सोडणे चांगले.

## 2. ब्लाड प्रेषर :

दारूच्या अधिक सेवनाने बीपी हाय होण्याची दाट शक्यता असते आणि त्यामुळे आपल्याला ह्दय विकाराचा झाटका ही येऊ शकतो.



## 3. लठ्ठ पण :

दारूचे जास्त प्रमाणात सेवन केल्यास आपल्याला लठ्ठपणा येऊ शकतो.



## 4. हृदय विकाराचे आजार :

जर का आपल्याला हाय बीपी हा आजार असेल तर सहाजीक आपल्याला हृदय विकाराचा झटका येऊ शकतो. सतत सेवन करणाऱ्या व्यक्तींना हे आजार



अधिक प्रमाणात होतात. तसेच त्यांना हृदयाचा झटका येण्याचीही दाट शक्यता असते. अशा व्यक्तिंचे ऑपरेशनही बऱ्याच वेळा फेल होण्याची शक्यता असते. त्यात त्यांच्या मृत्यु होतो व त्यामुळे जीव तर जीव व पैसा ही वाया जातो. आणि घरच्यांचे होणारे हाल वेगळेच.



## 5. निराशा :

मानवी जीवनातील दर रोजच्या दगदगीचा परिणाम त्याच्या मनावर होतो. व त्याच्यावर

एक वेगळाच ताण निर्माण होत असतो .म्हणून तो ताण दुर करण्यासाठी नशा करण्यास सुरूवात करतो. अनेकदा तर त्याला कळतच नाही की तो दारूची नशा करण्यास सुरूवात कधी करतो व दारूच्या नियमीत सवयी मुळे तणावाच्या ऐवजी तो आपले आयुष्य गमावून बसतो.म्हणून दारूची सवय मोडून ताणमुक्त होण्यातच हुशारी आहे कारण तणावा पेक्षा हे जीवन महत्वाचे आहे.

## 6. एनिमीया :



जेव्हा आपण दारूचे सेवन करता. त्यावेळी रक्त योग्य प्रमाणात शरीराला ऑक्सीजनचा पुरवठा करू शकत नाही. अशा प्रकारची स्तिथी खुप धोकादायक असते. अशा स्तिथीत आपण काम न करताच थकलेलो असतो. म्हणून स्वत:ला क्रियशील ठेवण्यासाठी दारूचे सेवन सोडणेच गरजेचे आहे.

## 7. सांधे दुखी :



मानवी हडांमध्ये युरिक एसिड जमा झाल्याने सांधे दुखी होते जर तुम्ही दारूचे सेवन करत असाल तर सांधे दुखीचा. त्रास भंयकर स्वरूपात होऊ शकतो.

## 8. पॅकीस :




दारूचे अधिक प्रमाणात सेवन केल्याने पॅकीस मध्ये सुज येते व त्यामुळे पचन क्रीया बिघडते. व हे आजार लवकर बरे होत नाही कधी कधी व्यक्तिच्या जीवाला ही धोका निर्माण होतो.

## ९. तंत्रिका क्षति :

अधिक दारू सेवानामुळे शरीरातील तंत्रिका क्षति निर्जीव होत जातात. त्यामुळे कोणतीही वस्तु टोचली तरी जाणवत नाही तसेच कित्येक तासा पर्यंत शरीर सुन्न होते.

## १०. नर्क :

होय आपण बरोबर ऐकल आहे 'नर्क'. दारू सेवन फक्त जीवना साठीच हनिकारक नाही तर त्याच्या सेवनाने मृत्यू नंतरही त्याचे भोगणे भोगावे लागणार आहेत. आपले शरीर जग निर्माता अल्लाह ने बनविले आहे आणि मनुष्या साठी कोणत्या गोष्टी चांगल्या आहेत व कोणत्या वाईट आहेत तोच चांगल्या प्रकारे जाणतो. म्हणून अल्लाहने पवित्र कुरआन मध्ये सर्व मानवांना दारू पासून दुर राहण्याचे आदेश दिले आहेत. आणि आता आमचे



कर्तव्य आहे की अल्लाहच्या आदेशांचे पालन करणे. नाहीतर तो सर्वशक्तीशाली अल्लाह आम्हास मृत्युनंतर पुन्हा जिवन देणार आहे व आमच्या पापची शिक्षा म्हणून नर्कात सुद्धा टाकु शकतो. अल्लाह उपदेश करतो हे ईमान वाल्यांनो हि दारू व जुगार आणि ति जागा ज्या ठिकाणी अल्लाहच्या शिवाय कोणा दुसऱ्याची पुजा केली जाते आणि ही सर्व कामे शैतानी आहेत तरी तुम्ही या कृतीपासून दूर रहा. जणेकडून तुम्ही यशस्वी व्हाल.



शैतान तर इच्छितोच की मद्य आणि जुगाराद्वारे तुमच्या दरम्यान शतृत्वं आणि द्वेष मत्सर निर्माण करावे आणि तुम्हाला अल्लाहच्या स्मरणापासून व नामज (आराधने)पासून रोखावे तेंव्हा तुम्हीं अशा कामांपासून दूर का राहत नाही ? ( कुरआन सुरह ५-९१)

अल्लाहने दारू पिण्यास मानवाला सक्त मनाई केली आहे. व दारूचा निषेध केला आहे. कारण ती मानवी जीवनासाठी अत्यंत हानीकारक आहे मानवासाठी काय चांगले आहे हे त्याचा निर्माता आपल्या पेक्षा अधिक चांगल्यारितीने जाणतो.

आम्हाला पाहिजे की आम्ही त्याच्या आदेशाचे पालन करून त्याच्या मार्गदर्शनाप्रमाणेच आपले जीवन व्यतीत करावे. दारू शिवाय अनेक इतर मार्गदर्शन देखील कुरआन मध्ये आहे. अल्लाहने सदर मार्गदर्शन संपूर्ण मानव जाती साठी केले आहे. म्हणूनच अल बिर्र तर्फे सर्व बंधु भगिनींना आम्ही पवित्र कुरआन वाचण्याचे निमंत्रण देत आहोत. जे फक़्त

मुस्लिम समजा पुरतेच मर्यादीत नाही तर ते संपूर्ण मानव जातीच्या मार्गदर्शनासाठी आहे.

रमजान तो महिना आहे ज्यामध्ये कुरआन अवतले गेले जे लोकांकरिता मार्गदर्शन आणि जे मार्गदर्शक आणि सत्य व असत्याच्या दरम्यान निर्णायक आहे. ( कुरआन सुरह २-१८५)



आपणास कळविण्यात अत्यानंद होतो की आमची संस्था ज्यांना कुरआन वाचण्याची इच्छा आहे आशा वाचकांना कुरआन मोफत भेट देऊ इच्छित आहे जे इंग्रजी, हिंदी, मराठी, गुजराती, आणि इतर अनेक भाषांमध्ये उपलब्ध आहेत. आम्हास पूर्ण विश्वास आहे की जर का सर्व लोकांनी पवित्र कुरआन ला आपले मार्गदर्शक बनविले तर सर्व लोक दारू सोडतील. आणि आपला भारत देश दारू मुक्त होऊन स्वच्छ भारत होईल. तर वाट कोणाची पहता दारू सोडा व भारताला महान बनवा. जर आपल्याला आपल्या भारताला स्वच्छ, सुरक्षित, व शक्तिशाली बनवायचे असेल तर समाजातून दारूचा नायनाट करावा लागेल.



# दारु सोडा



आपल्या शरीर आणि आत्म्याच्या संपूर्ण मार्गदर्शनासाठी वाचा पवित्र कुरआन.

ज्यांना कुरआन वाचण्याची इच्छा आहे असे वाचक आपल्या भाषेत निःशुल्क पवित्र कुरआन मिळविण्यासाठी कॉल करा ही भेट सर्व जाती व धर्मियांसाठी उपलब्ध आहे. ऑर्डर करण्यासाठी फक्त हे करा.

- ☑ **१. नाव**
- ☑ **२. मोबाइल नंबर**
- ☑ **३. पत्ता**
- ☑ **४. कुरआनाची भाषा**

खालील फोन नंबर वर कॉल किंवा एस.एम.एस. करू शकता हे पवित्र कुरआन आपल्या घरी निःशुल्क मिळविण्या करीता त्वरीत कॉल करा.




**Call for Mumbai**

**+91 8767 333555 / 9987 445522**

**Call for Pune**

**+91 9021259021 / 8484841847**

www.albirr.in

**Email : freequran@albirr.in**

**Branches**

**Mumbai ◆ Mumbra ◆ Mira Road ◆ Pune ◆ Mangaon (Kokan)**